आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२२-२३ या वर्षाकरीता केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषी उन्नती अंतर्गत बियाणे व लागवड साहित्यावरील उपअभियान (ग्रामबीजोत्पादन) या योजनेकरीता निधी वितरण.
(केंद्र हिस्सा - २४०१ ए ६२८)
(राज्य हिस्सा - २४०१ ए ६३७)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः बीयुडी-२०२२/प्र.क्र.०७/कार्यासन ६**
**मंत्रालय विस्तार, मुंबई**-४०० ०३२
**दिनांक:** ३१ **मार्च,** २०२३.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२, दि.०८.०२.२०२३ व दि.१६.०३.२०२३.
२) केंद्र शासन, कृषी मंत्रालय यांचे पत्र क्र. File NO.10-11/2020-SD.VI, Dt.22.03.2023.
३) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र.योजना-३३२३/प्र.क्र. १५७/कार्या १-अे.

**प्रस्तावना :-**

कृषी व पदुम विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषी कृषी उन्नती योजना अंतर्गत बियाणे व लागवड साहित्यावरील उपअभियान (ग्राम बीजोत्पादन ) योजनेचा अनुसूचित जमाती घटकासाठी प्राप्त झालेला केंद्र हिस्सा रु.२१२.१२ लाख व समरुप राज्य हिस्सा रु.१४१.४१ लाख इतका निधी वितरीत करण्याबाबत कृषी विभागाकडून संदर्भाधीन क्र.३ अन्वये वित्त विभागास प्रस्ताव सादर करण्यात आला होता.

सदर प्रस्तावास वित्त विभागाने सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाच्या मंजूर सुधारीत अंदाजाच्या निधी वितरणास दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष, २४०१- पीक संवर्धन या मुख्य लेखाशीर्षाखाली कृषी उन्नती योजना अंतर्गत बियाणे व लागवड साहित्यावरील उपअभियान (ग्रामबीजोत्पादन ) योजनेंतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी मंजूर सुधारीत अंदाजात केंद्र हिस्सा रु. २१२.१२ लाख व समरुप राज्य हिस्सा रु.१४१.४१ लाख असा एकूण रु.३५३.५३ लाख इतका निधी खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.लाखात)

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष व केंद्र / राज्य हिस्सा | बाब | सन २०२२-२३ साठी सुधारीत अंदाज | या शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ६ |
| कृषी उन्नती योजना-बियाणे व लागवड साहित्यावरील उप अभियान | २४०१ ए ६२८ केंद्र हिस्सा (६० %) | ३३, अर्थसहाय्य | १२००.०० | **२१२.१२** |
| | २४०१ ए ६३७ राज्य हिस्सा (४० %) | | ५००.०० | **१४१.४१** |
| **एकूण** | | | **१७००.००** | **३५३.५३** |

२. उपरोक्त प्रमाणे एकूण **रु. ३५३.५३ लाख (अक्षरी रुपये तीन कोटी त्रेपन्न लाख त्रेपन्न हजार पाचशे फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून प्रधान सचिव, कृषी व पदुम विभाग यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या शासन आदेशातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित विभागाची राहील.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४२१-२३, दि.३१.०३.२०२३अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेस तसेच संदर्भ क्र.१ मधील परिपत्रकातील तरतुदींस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३१२२३०५८८४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2023.04.17 13:27:27 +05'30'

**(राजेंद्र दे. भवारी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अप्पर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य,पुणे.
५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
७. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
८. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
९. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.